विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
कार्यालयातील विमा सह संचालक (गट-अ)
(राजपत्रित) पदावर पदोन्नती....
निवडसूची २०२१-२२

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन आदेश क्रमांक : आस्थाप-२०२१/प्र.क्र.७७/विमा प्रशासन,**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०२ फेब्रुवारी, २०२२

वाचा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/ कार्यासन-१२, दि.०१.०८.२०१९
२) वित्त विभाग, अधिसूचना क्र.डीओआय-११८३/सीआर-२/८४/एडीएम-५, दि.०१.०१.१९८७
३) शासन आदेश, वित्त विभाग, क्र.आस्थाप-२०२१/प्र.क्र.९०/विमा प्रशासन, दि.१०.१२.२०२१

**-: आदेश :-**

विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील खाली नमूद विमा उप संचालक (गट-अ) (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस २३ : रु. ६७७००-२०८७००) यांना विमा सह संचालक (गट-अ) (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस २५ : रु.७८८००-२०९२००) या पदावर नियमित पदोन्नती कोट्यातील रिक्त असलेल्या एकाकी पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्याचे नांव | प्रवर्ग | सध्याचे पद | पदोन्नतीनंतरचे पद |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ | श्री.अनंत रघुनाथ इंदुलकर | खुला | विमा उप संचालक (गट-अ) | विमा सह संचालक (गट-अ) |

२. मा.सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयाच्या अधीन राहून, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सदर पदोन्नती देण्यात येत आहे.
३. रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.
४. विमा सह संचालक हे पद महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील असल्याने सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमित करण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल. सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमित केल्यानंतर पदोन्नतीच्या पदावर सेवाज्येष्ठता व अन्य सेवाविषयक लाभ मिळण्यास पदोन्नत अधिकारी पात्र ठरतील.
५. पदोन्नती नंतर त्यांची पदस्थापना विमा सह संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदावर करण्यात येत आहे.

६. सदर आदेशाच्या परिणामी, दि.१०.१२.२०२१ च्या शासन आदेशान्वये श्री.अ.र.इंदुलकर यांचेकडे सोपविण्यात आलेला विमा सह संचालक पदाचा अतिरिक्त कार्यभार संपुष्टात येत आहे.

७. सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत पदोन्नतीच्या पदावरील नियुक्ती न स्वीकारल्यास पदोन्नतीचे आदेश रद्द करण्यात येतील.

८. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात येत असून त्याचा संगणक संकेताक २०२२०२०२१४४८४०३९०५ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK RAMBHAJI DAHIPHALE

Digitally signed by VIVEK RAMBHAJI DAHIPHALE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=56142975484e58364afe88f5f0e3138e3ce0d4e4058e42f003dfd69500064afb, serialNumber=3981a50612646983d580dea2da5fb52a33d8e6e3c4f34cd80f08c598711ceb65, cn=VIVEK RAMBHAJI DAHIPHALE
Date: 2022.02.02 14:49:47 +05'30'

**( वि. रं. दहिफळे )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) महालेखापाल, (लेखा परीक्षा) १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
४) विमा संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) विमा सहाय्यक संचालक (प्रशासन), विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) अवर सचिव, (कार्यासन-१३/कार्यासन -१६ब) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई
८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई
९) श्री.अ.र.इंदुलकर, विमा उप संचालक (विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेमार्फत)
१०) निवड नस्ती, (विमा प्रशासन).